**मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/ २०१५ व इतर याचिकांमध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर देण्यात आली होती, त्यास मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२
दिनांक : २५ जानेवारी, २०२२.

वाचा -

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २१/१२/२०१९.
२. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.४/१/२०२०.
३. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक, क्र.न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.१५/०१/२०२०.
४. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन शुध्दीपत्रक, क्र.न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.३१/१/२०२०.
५. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.२९/६/२०२०.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २७/११/२०२०.
७. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन पत्र क्र. न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११० (भाग-१)/प्रशा-५, दि.०४/१२/२०२०.
८. शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, शासन निर्णय, क्र.न्यायाप्र-२०१९/प्र.क्र.११०/१९/प्रशा-५, दि.१३/०९/२०२१.
९. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि. २८/१०/२०२१.

**प्रस्तावना –**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर याचिकांमध्ये दि. ०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या गट-क मधील ११ व गट-ड मधील ३ अशी एकूण १४ अधिसंख्य पदे संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यास संदर्भ क्र.०२ येथे नमूद दि.०४/०१/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. तसेच अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या गट-क मधील ०२ व गट-ड मधील ०२ अशी एकूण ०४ अधिसंख्य पदे

विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यास संदर्भ क्र.०५ येथील दि.२९/०६/२०२० च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. अनुसूचित जमाती प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांच्या यादीमधून खालीलप्रमाणे ०२ कर्मचाऱ्यांची नावे वगळण्यात आलेली आहेत :-

(अ) श्री. रमेश महादेव राऊत, कनिष्ठ लिपीक, विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर यांनी जात पडताळणी समितीने दिलेल्या निर्णयाविरुध्द दाखल केलेल्या याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने Status-quo दिलेला आहे. त्यामुळे श्री. राऊत यांचे नाव संदर्भ क्र.३ येथील दि.१५/०१/२०२० च्या शासन शुध्दीपत्रकान्वये वगळण्यात आले आहे.

(ब) श्री. प्रविण पिसे, वरिष्ठ लिपिक, शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हापरिषद, अकोला यांचे नाव संदर्भ क्र.२ येथील दि.०४/०१/२०२० रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या सहपत्रातून वगळण्यास मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल (सिव्हील) क्र.२६३६१/२०१८ च्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून संदर्भ क्र.८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.६ च्या शासन निर्णयान्वये दिलेल्या निदेशानुसार अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरल्याने अधिसंख्य पदावर दिलेल्या नियुक्तीस ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदांना मुदतवाढ देण्याबाबत निदेश देण्यात आले होते. त्यास अनुसरुन संदर्भ क्र.७ येथे नमूद दि.०४/१२/२०२० रोजीच्या पत्रान्वये आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे कार्यालयास कार्यवाही करण्याबाबत निदेश देण्यात आले होते. तदनंतर सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.९ येथे नमूद दि.२८/१०/२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये अधिसंख्य पदावर मुदतवाढ देण्यात आलेल्या अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या अधिसंख्य पदावरील नियुक्त्यांना त्यांच्या अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत, यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदांना मुदतवाढ दिली आहे. सदर निर्णयास अनुसरुन आयुक्त (शिक्षण) व त्याच्या अधिनस्त कार्यालयांतील अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र अवैध ठरल्याने अधिसंख्य पदांवरील वर्ग-३ व वर्ग-४ मधील कर्मचाऱ्यांच्या नियुक्तीस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

माननीय सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपिल क्र. ८९२८/२०१५ व इतर याचिका यामध्ये दि.०६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची राज्यात अंमलबजावणी करण्याबाबत, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.२१/१२/२०१९ नुसार या विभागाच्या अधिनस्त आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील खालीलप्रमाणे अधिसंख्य पदांवर देण्यात आलेल्या नियुक्त्यांना, त्यांच्या अधिसंख्य पदावरील ११ महिन्यांचा कालावधी संपुष्टात आल्यानंतर पुढील ११ महिने किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | सेवानिवृत्ती दिनांक | पदनाम | आस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | श्री. एस. एस. मडकई | दि.२८/०२/२०२३ | मुख्य लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर |
| २. | श्री. बी. आर. कोळी | दि.३१/१२/२०२२ | मुख्य लिपिक | |
| ३. | श्रीमती एल. एम. दुर्गावळे | दि.३१/०५/२०२२ | शिपाई | |
| ४. | श्री. बी. एम. कोळी | दि.३१/०५/२०२३ | शिपाई | |
| ५. | श्री. भारत शिवदास ढवळे | दि.३१/०३/२०२८ | मुख्य लिपिक | |
| ६. | श्री. आर. एस. निनावे | दि.३०/०६/२०२२ | लेखापाल | |
| ७. | श्री. एस. एम. ढोले | दि.३१/१२/२०२७ | वरिष्ठ लिपिक | |
| ८. | श्री. अजय नागोसे | दि.३१/०१/२०२९ | शिपाई | |
| ९. | श्री. गणेश कृष्णराव बायसकर | दि.३०/०६/२०३० | कनिष्ठ लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती |
| १०. | श्री. दिनेश हिम्मतराव बचे | दि.३०/०४/२०२७ | मुख्य लिपीक | |
| ११. | श्री. राजेश दलपतसिंह नरवैय्या | दि.३१/०५/२०२८ | शिपाई | |
| १२. | श्री. रामदास व्ही. इंगळे | दि.३०/०६/२०२५ | शिपाई | |

अधिसंख्य पदांवर नियुक्ती देण्यात आलेल्या १८ कर्मचाऱ्यांपैकी खालील ०४ कर्मचारी सेवानिवृत्त झाले असल्याने, त्यांना यापुढे मुदतवाढ देण्याची आवश्यकता नाही :-

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | सेवानिवृत्ती | पदनाम | आस्थापना |
|---|---|---|---|---|
| १. | श्रीमती सरोज पुंडलिकराव कुंभारे | दि.३१/०५/२०२० | प्रशासन अधिकारी | विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती |
| २. | श्री. शांताराम तेजराव डेकाटे | दि.३०/०९/२०२० | मुख्य लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर |
| ३. | श्री. व्ही. एस. गुरव | दि.३१/०५/२०२० | वरिष्ठ लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, कोल्हापूर विभाग, कोल्हापूर |
| ४. | श्री. वसंत नानाजी बारापात्रे | दि.३१/१२/२०२१ | कनिष्ठ लेखापरिक्षक | विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर |

२. खालील तक्यात नमूद अनुक्रमांक १ या कर्मचाऱ्यांचे नाव मा. उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर येथे प्रलंबित असल्याने संदर्भ क्र. ४ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये त्यांचे अधिसंख्य पदावरुन वगळण्यात आले आहे. तसेच अनुक्रमांक-२ या कर्मचाऱ्याचे नाव मा. सर्वोच्च न्यायालयाच्या अंतिम निर्णयाच्या अधिन राहून संदर्भ क्र. ८ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये त्यांचे अधिसंख्य पदावरुन वगळण्यात आले आहे :-

| अ.क्र. | कर्मचाऱ्यांचे नाव | पदनाम | आस्थापना |
|---|---|---|---|
| १ | श्री. रमेश महादेव राऊत | कनिष्ठ लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर |
| २ | श्री. प्रविण पिसे | वरिष्ठ लिपिक | विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती विभाग, अमरावती |

या प्रकरणी मा. उच्च न्यायालय व मा. सर्वोच्च न्यायालयात दाखल अपीलांमध्ये देण्यात आलेल्या आदेशाबाबत संबंधित विभागीय शिक्षण उपसंचालक यांनी शासनास वेळोवळी अवगत करावे.

३. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे व त्यांच्या अधिनस्त असलेल्या सर्व क्षेत्रीय कार्यालयांना/ आस्थापनांना योग्य ते निदेश देऊन या आदेशाची तातडीने अंमलबजावणी करावी.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०१२५१७३१५१९४२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by TIKARAM WAMAN KARPATE
Date: 2022.01.25 17:33:37 +05'30'

(टि. वा. करपते)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य
४. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
५. मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण यांचे स्वीय सहाय्यक
६. अपर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महालेखापाल - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
१०. महालेखापाल - १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
११. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२. संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे
१४. विभागीय शिक्षण उपसंचालक, (सर्व)
१५. निवडनस्ती (प्रशा-५).